(१४ पैकी शासन निर्णय क्र.१२)

**फौजदारी खटल्यातील सिध्दापराध प्रमाण वाढविण्यासाठी उपाययोजना करण्याबाबत.**
**सात वर्षे किंवा सात वर्षापेक्षा जास्त शिक्षा असलेल्या गुन्हयांमध्ये सरकारी कर्मचारी पंच म्हणून घेण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डीपीपी-२०१२/प्र.क्र.१०/पोल-१०**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, दुसरा मजला,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : १२ मे, २०१५**

**प्रस्तावना :-**

एखादा गुन्हा घडल्यानंतर घटनास्थळाचा व वेळोवेळी पुरावा गोळा करताना तपासी अधिकारी पंचनामा करीत असतात. अशा पंचनाम्याच्यावेळी उपस्थित असलेल्या पंचाचे जबाब खटल्याच्या सुनावणी दरम्यान महत्वपुर्ण ठरत असतात. गुन्हा घडल्यानंतर खटला सुनावणीस येण्याकरिता काही प्रकरणांमध्ये बराच कालावधी उलटून गेलेला असतो. तपासी अधिका-याने तत्कालीन परिस्थितीत उपस्थितीत केलेले पंच सुनावणी दरम्यान प्रामाणिक राहतील याची खात्री नसते. पंच फितूर झाल्यामुळे ब-याचश्या गंभीर गुन्हयांमध्ये आरोपी निर्दोष सुटतात. त्यामुळे दोषारोपसिध्दीचे प्रमाणे घटत असल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. गुन्हयाच्या तपासादरम्यान पंच म्हणुन सरकारी कर्मचा-यांची सेवा घेतल्यास सुनावणी दरम्यान पंच फितुर होण्याची शक्यता फार कमी राहिल अशा निष्कर्षाप्रत शासन आले आहे. सबब, गुन्हयाच्या तपासादरम्यान सरकारी कर्मचारी पंच म्हणून घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पंच फितुर होऊन दोषारोपसिध्दीचे प्रमाण कमी होणा-या प्रकारास आळा घालण्याच्या दृष्टीने सात वर्षे किंवा सात वर्षापेक्षा जास्त शिक्षा असलेल्या गुन्हयांमध्ये सरकारी कर्मचारी पंच म्हणून घेण्याचा निर्णय सदर शासन निर्णयान्वये घेण्यात येत आहे.

२. ज्या गुन्हयामध्ये सात वर्षे किंवा सात वर्षापेक्षा जास्त शिक्षा नमूद केली असेल अशा प्रकरणांमध्ये तपासी अधिकारी यांनी शक्यतोवर सरकारी कर्मचा-याची पंच म्हणून सेवा घ्यावी.

३. सदरची सेवा पंच म्हणून घेताना ज्या परिसरामध्ये खटल्याची सुनावणी होणार आहे त्या परिसरात वास्तव्य असणा-या सरकारी कर्मचा-यास पंच म्हणून घ्यावे जेणेकरुन खटल्याच्या सुनावणीदरम्यान सदर पंचास उपस्थित राहणे सुलभ होईल.

४. पंच म्हणून घेत असलेल्या सरकारी कर्मचा-याचे चारित्र्याबाबत प्रथम मौखिक स्वरुपात तपास अधिका-याने खातरजमा करुन घ्यावी.

५. एकाच सरकारी कर्मचा-यास अनेक गुन्हयांत वारंवार पंच म्हणून घेण्यात येवू नये.

६. गुन्हयातील फिर्यादी व आरोपी यांचे नातेवाईक असलेल्या सरकारी कर्मचा-यास पंच म्हणून घेण्यात येवू नये.

**७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१५०५१२१७१६२६००२९ हा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatray Santaram Patil

Digitally signed by Dattatray Santaram Patil
DN: CN = Dattatray Santaram Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.13 12:55:16 +05'30'

**(द.सं.पाटील)**
**उप सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय मुंबई.
४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य
५. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन, मुंबई
६. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
७. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा),गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
८. प्रधान सचिव व विधी परामर्श, विधी व न्याय विभाग मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, विशेष, मंत्रालय, मुंबई
१०. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई
११. सर्व पोलीस आयुक्त
१२. विशेष पोलीस महानिरीक्षक, सर्व परिक्षेत्र
१३. सर्व अपर पोलीस महासंचालक
१४. सर्व जिल्हाधिकारी
१५. सर्व प्रधान जिल्हा व सत्र न्यायाधीश
१६. सर्व पोलीस अधीक्षक
१७. संचालक, अभियोग, संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१८. मा.राज्यमंत्री (शहरे) यांचे खाजगी सचिव
१९. मा.राज्यमंत्री (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
२०. सह सचिव (आस्थापना)
२१. सर्व सह सचिव/उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२२. सर्व कार्यासने, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. निवडनस्ती